मुंबई शहर विकास योजनेंतर्गत रिक्त असलेल्या ०२ सदनिका वाटप करण्याबाबत परमार्थ सेवा समिती,परळ,मुंबई

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: सदनिका-२०२३/प्र.क्र.४८६/सामासू**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १५ मार्च, २०२४

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सामाजिक न्यायशासन निर्णय ,क्रिडा व विशेष सहाय्य विभाग,सांस्कृतिक कार्य, -मुंवियो.क्र१०९०/३२६८० (४५९)-सुधार/१दि. ,२३.३.१९९४
२) शासन निर्णय, सामाजिक न्याय क्रिडा व विशेष,सांस्कृतिक कार्य,सहाय्य विभागशासन निर्णय , -मुंवियो.क्र२०००क्र..प्र/५७१-सुधार/१दि. ,२८.११.२००१
३) सामाजिक न्याय-मुंवियो.शासन निर्णय क्र ,क्रिडा व विशेष सहाय्य विभाग,सांस्कृतिक कार्य, २०००क्र..प्र/५७१-सुधार/१दि. ,१२.७.२००४
४) आयुक्त, समाजकल्याण पुणे यांचे पत्र जा. क्र. सकआ/मावक/गृहनिर्माण/२०२२-२३/का-१२/२०९, दि.१०.२.२०२३.

**प्रस्तावना :-**

मुंबई शहर विकास योजना, १९८९-९० अंतर्गत या विभागाला प्राप्त झालेल्या सदनिका महिला कल्याण, बाल कल्याण, अपंग कल्याण, मतिमंदाचे कल्याण, व्यसनमुक्ती कार्यक्रम तसेच अनुसूचित जाती, विमुक्त भटक्या जमाती यांच्यासाठी विशेष कार्यक्रम राबविणाऱ्या व ज्येष्ठ नागरिकाचे उपक्रम राबविणा-या स्वयंसेवी संस्थांना / महामंडळांना भाडेपट्टी तत्वावर उपरोक्त बाचा क्र (१) (२) व (३) या शासन निर्णयान्वये ठरविलेल्या नियम व अटींच्या अधिन राहून पात्र स्वयंसेवी संस्थांना देण्यात येतात.या योजनेतंर्गत स्वयंसेवी संस्थांना वाटप करण्यात आलेल्या पात्र संस्थांना सदनिका वाटप करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मुंबई शहर विकास योजना, १९८९-९० अंतर्गत सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाला प्राप्त झालेल्या सदनिका उपरोक्त प्रयोजनार्थ स्वयंसेवी संस्थांना भाडे तत्वावर देण्यात येतात. या योजनेतंर्गत रिक्त असलेल्या सदनिका वाटपासंदर्भात स्वयंसेवी संस्थांकडून नव्याने प्राप्त झालेल्या अर्जानुसार खालील संस्थेला ०२ सदनिका वाटप करण्यास शासन मान्यता देत आहे.

| अ.क्र. | संस्थेचे नाव | सदनिकेचे ठिकाण |
|---|---|---|
| १ | परमार्थ सेवा समिती,परळ,मुंबई | अशोकवन सोसायटी बोरिवली पुर्व, |

प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण अधिकारी, मुंबई यांनी शासन निर्णय दि. २८/११/२००१ च्या तरतूदीनुसार आवश्यक तो करारनामा करुन सदनिका वाटपासंदर्भात कार्यवाही करावी. तसेच संस्थेकडून आवश्यक त्या कागदपत्रांची पूर्तता झाल्यानंतर संस्थेला दिलेल्या सदनिकेचा ताबा दिल्याबाबतचा अहवाल

शासनास सादर करावा तसेच शासन निर्णय दि. २८/११/२००१ च्या तरतूदीनुसार प्रादेशिक उपायुक्त. समाजकल्याण अधिकारी, मुंबई यांनी कार्यवाही करावी.

सदर संस्थेस त्यांच्या योजना राबविण्यासाठी ०२ वर्षाच्या कालावधीकरीता देण्यात येत आहे.

तसेच सदर सदनिकांची वीज देयक व देखभाल खर्च हा संस्थेने स्वत:च्या स्तरावर करावा. तसेच स्वयंसेवी संस्थेने सदनिकेचा वापर दिलेल्या कामासाठी योग्यरित्या केला असल्यास ०२ वर्षानंतर त्यांना शासन स्तरावर मुदतवाढ देण्यात येईल.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक सांकेतांक क्र २०२४०३१५२३३४५७५८२२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJESH SADASHIV MANJREKAR

Digitally signed by RAJESH SADASHIV MANJREKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=165bc3b66844eff888fd282269f8913cd36baadbc01bcf006e056fb7f6a93c4d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7E57ADD6A85F0CF35923F0F015D8E4D4D3A72EC43AD6008F036A3AB06AA1BB85, cn=RAJESH SADASHIV MANJREKAR
Date: 2024.03.15 23:44:13 +05'30'

**( राजेश स. मांजरेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,१. मा.मुख्यमंत्री महोदयांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई**

२. आयुक्त, समाजकल्याण, पुणे.

३. प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, मुंबई

४. सहायक आयुक्त, समाजकल्याण, मुंबई उपनगर

५. अध्यक्षमुंबई,परळ,परमार्थ सेवा समिती,सचिव/

६. निवडनस्ती (सामासू)